# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
### शासन ज्ञापन क्रमांक-दुरुस्ती-०२१७/प्र.क्र.१४२/पोल-७.

मंत्रालय, दुसरा मजला, मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-४०००३२.
दिनांक २७ मार्च २०१७.

**विषय** :- पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस ठाणे, आग्रीपाडा, पोलीस ठाणे, ना.म. जोशी मार्ग, पोलीस ठाणे, पायधुनी, पोलीस ठाणे, ताडदेव, पोलीस ठाणे, डोंगरी व पोलीस दवाखाना यांच्या आवारांतील इमारतींची दुरुस्ती करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**संदर्भ** :-
१) शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१४/ प्र.क्र.४९/ १४/ विनियम, दिनांक ०५.०१.२०१५.
२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ १३/विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५.
३) पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या कार्यालयाचे पत्र क्र. पोआ/कक्ष-८(४)/शा.३८/२०१७, दिनांक ०३.०२.२०१७.

**ज्ञापन** :-

पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांनी त्यांच्या संदर्भाधीन पत्राद्वारे पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, यांच्या अधिकारक्षेत्रातील पोलीस ठाणे, आग्रीपाडा, पोलीस ठाणे, ना.म. जोशी मार्ग, पोलीस ठाणे, पायधुनी, पोलीस ठाणे, ताडदेव, पोलीस ठाणे, डोंगरी व पोलीस दवाखाना यांच्या आवारांतील इमारतींची दुरुस्ती करण्याचा प्रस्ताव (२७ कामे) सादर केला आहे.

२. उक्त कामांसाठी उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, उपविभाग क्र.२, वरळी, मुंबई, यांनी सन २०१५-१६ च्या दरसूचीनुसार तयार केलेले रु.८०,८५,३५०/- इतक्या खर्चाचे अंदाज (२७ कामांसाठी) सादर केले आहेत. उक्त खर्चाचे अंदाज कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मध्य मुंबई, यांनी प्रमाणित केले आहे.

३. उक्त खर्चाचे अंदाज सार्वजनिक बांधकाम विभागाने तपासले आहेत व ते पुढीलप्रमाणे सुधारित केले आहेत (२० कामे):-

| अ.क्र. *(१)* | कामाचे नाव *(२)* | खर्चाचे अंदाज *(३)* |
|---|---|---|
| 1. | Repairs of Building No.1 and 2 at Tardeo Police campus, Mumbai. | Rs.2,71,399/- |
| 2. | Various repairs of Building No.3 and 4 at Tardeo Police campus. | Rs.2,70,948/- |
| 3. | Petty repairs of Building No.5 and 6 at Tardeo Police campus, Mumbai. | Rs.2,71,670/- |

| अ.क्र. (१) | कामाचे नाव (२) | खर्चाचे अंदाज (३) |
|---|---|---|
| 4. | Repairs of Building No.7 at Tardeo Police campus, Mumbai. | Rs.2,71,806/- |
| 5. | Various repairs of Building No.9 at Tardeo Police Campus, Mumbai. | Rs.2,71,211/- |
| 6. | Various repairs of Buildings No.10 at Tardeo Police campus, Mumbai | Rs.2,71,760/- |
| 7. | Repairs of Buildings No.11 at Tardeo Police campus, Mumbai | Rs.2,71,850/- |
| 8. | Repairs of Buildings No.11A at Tardeo Police campus, Mumbai | Rs.2,72,136/- |
| 9. | Repairs of Buildings No.4A at Tardeo Police campus, Mumbai | Rs.2,72,225/- |
| 10. | Repairs of Buildings No.8 at Tardeo Police campus, Mumbai | Rs.2,71,805/- |
| 11. | Repairs of Bhendi Bazar Police Line, Mumbai | Rs.2,71,399/- |
| 12. | Repairs of Dongri Police Line, Mumbai | Rs.2,71,098/- |
| 13. | Repairs of Mandavi Police Line, Mumbai | Rs.2,17,940/- |
| 14. | Repairs of Old Police Line, Agripada, Mumbai | Rs.2,71,398/- |
| 15. | Repairs of New Police Line at Agripada, Mumbai | Rs.2,70,948/- |
| 16. | Various Repairs of three European Quarters, Agripada, Mumbai | Rs.2,71,670/- |
| 17. | Repairs of Officers Quarters, Agripada, Mumbai | Rs.2,71,805/- |
| 18. | Various repairs of Police Servants Quarters, Agripada, Mumbai | Rs.2,71,211/- |
| 19. | Repairs of Three European Quarters, N.M. Joshi Marg, Mumbai | Rs.2,71,760/- |
| 20. | Various repairs of Two and Eight Officers Quarters, N.M. Joshi Marg, Mumbai. | Rs.2,71,851/- |
| | | Rs.54,31,620/- |

४. उक्त २० कामे करण्यासाठी इमारतनिहाय/वसाहतनिहाय एकत्रित निविदा मागविण्यात याव्या या अटीवर, परिच्छेद ३ मधील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे खर्चाच्या अंदाजांना प्रशासकीय मान्यता देण्यास सार्वजनिक बांधकाम विभागाने सहमती दिली आहे.

५. त्या अनुसार, परिच्छेद ३ मधील तक्त्यातील स्तंभ (२) मध्ये विनिर्दिष्ट केलेली कामे करण्यासाठी स्तंभ (३) मध्ये विनिर्दिष्ट केल्यानुसार एकूण रु. ५४,३१,६२०/- इतक्या खर्चाच्या अंदाजास, उक्त २० कामे करण्यासाठी इमारतनिहाय/वसाहतनिहाय एकत्रित निविदा मागविण्यात याव्या या अटीवर, निधी उपलब्ध झाल्याशिवाय कामास सुरुवात करु नये या अटीवर याद्वारे, मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

**६.** उक्त कामासाठी येणारा खर्च हा बी-१, मुख्य लेखाशीर्ष, २०५५, पोलीस (०२), शहर पोलीस, शहर पोलीस आस्थापना (दत्तमत) (२०५५ ००९७), २७, लहान बांधकामे, या लेखाशीर्षाखाली उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**७.** हे ज्ञापन सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.३२६/इमा-२, दिनांक २२.०३.२०१७, अन्वये मिळालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

८. हे ज्ञापन महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०३२७१८२४१००७२९ असा आहे. हे ज्ञापन डीजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Swapnil Gopal Borse

Digitally signed by Swapnil Gopal Borse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=66835707253ff77ef0e333eb3ad582f9b876d443b2654088832e43dcad21c52a, cn=Swapnil Gopal Borse
Date: 2017.03.27 18:26:14 +05'30'

**(स्वप्नील गोपाल बोरसे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**
पोलीस आयुक्त, बृहन्मुंबई, मुंबई.

**प्रत :-**

१) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग (व्यय-७/विनियम), मंत्रालय, मुंबई.
२) प्रधान सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई.
३) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडल, मुंबई.
४) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मध्य मुंबई, मुंबई.
५) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
६) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, मुंबई.
७) निवड फाईल (पोल-७).